**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : संकर्ण-१११९/(प्र.क्र.१४२/१६)/समन्वय,
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०१७.

**विषय :-** डॉ.बाबासाहेब आंबेडकर, यांच्या साहित्याचे खंड प्रकाशनासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्र.डिबीए-२००८/(८६/०८)/समन्वय, दि.३० सप्टेंबर, २००८.
२) शासन निर्णय क्र.डिबीए-२००८/(८६/०८)/समन्वय, दि.१८ नोव्हेंबर, २००९.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.उशिसं/ डॉ.बाआंग्रंप्र/ खंड/छपाई/२०१६-१७/प्रशा-३/१४६८९, दि.२६.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर, महात्मा ज्योतीराव फुले, राजर्षी शाहू यांचे साहित्य प्रकाशित करण्यासाठी उपरोक्त संदर्भाधिन अ.क्र.१ च्या शासन निर्णयान्वये तीन वेगवेगळया समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन अ.क्र.२ च्या शासन निर्णयान्वये या महापुरुषांच्या साहित्याचा शोध घेणे, आवश्यक वाटल्यास राज्यात /राज्याबाहेर दौरे करणे, साहित्याची तपासणी करणे, साहित्याची विगतवारी व संशोधनात्मक प्रक्रिया करणे, साहित्याचे मुद्रण व पुनर्मुद्रण करणे व आवृत्ती काढण्यास मान्यता देण्यात आली आहे. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन अ.क्र.४ च्या पत्रान्वये डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे प्रकाशित करण्यात आलेल्या खालील खंडांच्या छपाईच्या रु.३७,८७,८९५/- इतक्या खर्चास मंजूरी देण्याची विनंती केली होती. सदर खर्चास मान्यता देण्याबाबत शासनाच्या विचारात होती. :-

**ज्ञापन :-**

अधिदान व लेखाधिकारी यांना कळविण्यात येते की, डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे खालील नमूद केलले ग्रंथ छपाईसाठी झालेल्या रु.३७,८७,८९५/- ( रुपये सदतीस लाख सत्याऐंशी हजार आठशे पंच्याण्णव फक्त ) इतक्या खर्चास शासन मंजूरी देण्यात येत आहे. :-

| अ. क्र. | खंडाचे नाव | प्रतींची संख्या | बिल क्र./दिनांक | छपाईची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | खंड क्र.११ ( इंग्रजी ) | २४१५ | ५७५२/७.१२.२०१६ | १३४९२६०.०० |
| २ | खंड क्र.१६ ( इंग्रजी ) | ३२२५ | १७७/३०.११.२०१६ | ६९९८२५.०० |
| ३ | खंड क्र.९ ( इंग्रजी ) | ३२२५ | १७८/३०.११.२०१६ | ३२२५००.०० |
| ४ | खंड क्र.५ ( इंग्रजी ) | ११५९ | ५७५३/८.१२.२०१६ | ५५३७३५.०० |
| ५ | खंड क्र.९ ( इंग्रजी ) | ५१६-साईड | १५२/८.११.२०१६ | ८६९७५.०० |
| ६ | ॲनिहिलेशन ऑफ कास्ट | ८९०० | ५६००/७.१२.२०१६ | ४४५०००.०० |
| ७ | खंड क्र.२ ( इंग्रजी ) | २९०० | ५५९९/७.१२.२०१६ | ३३०६००.०० |
| | | | एकूण | ३७,८७,८९५.०० |

२. सदर खर्च, " मागणी क्रमांक डब्ल्यु-४, प्रधानशिर्ष २२०५-कला व संस्कृती, ८००-इतर खर्च, (०१) समित्या व समारंभ, (०१) (०३) थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन (२२०५ ३१४३), १६-प्रकाशने " या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१६-१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर खर्च करण्यास संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूरी शासनाने ठरवून दिलेल्या प्रचलित कार्यपद्धती व नियमानुसार कार्यवाही करण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदर ज्ञापन चे वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थयं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ मधील तरतूदीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३२७१५४२१६३७०८ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.03.29 17:07:56 +05'30'

( सिध्दार्थ खरात )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री ( उ. व तं. शि. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री ( उ. व तं. शि. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.अपर मुख्य सचिव ( उ.व तं.शि.विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक.
४. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. संचालक ( उच्च शिक्षण ), उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सह संचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०. वित्त विभाग ( व्यय-५ व अर्थसंकल्प-८ ), मंत्रालय, मुंबई.
११. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ( विघयो-१ ), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी ( साशि-१ ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सदस्य सचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समिती, शासकीय बॅरॅक नं.१८, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मंत्रालयासमोर, मुंबई.
१४. निवड नस्ती ( समन्वय ).